# बहर - जूलै २०१४ –१५

# महाराष्ट्र मंडळ अबुधाबी .....





# अनुक्रमणिका

# संपादकीय

वैष्णवांच्या गर्दीने आला चंद्रभागेस भक्तीचा महापूर

पंढरपूर - झळझळीत सोमकळा।कळस दिसतो सोज्वळा।।

चंद्रभागेत स्नान, वाळवंटात रंगलेल्या दिंड्यांच्या हजेऱ्या आणि कळसाचे मनोभावे दर्शन घेऊन लाखो वैष्णवांनी "देह जावो अथवा राहो, पांडुरंगी दृढ भावो" असा भाव मनी बाळगत गेल्या आठवड्यात विठुरायाच्या चरणी आपली आषाढी वारी समर्पित केली.

विठूरायाला नमन करीत आज बहर जुलै २०१४ चा अंक आपणास सुपूर्त करताना विशेष आनंद होत आहे. प्रथेप्रमाणे तुम्ही पाठविलेले लेख, कविता यांची गुंफण तर आहेच. परंतु याशिवाय आपल्या बालमित्रांनी मंडळाच्या "एकांकिकेच्या" कार्यक्रमा दरम्यान चित्रविलेली काही रंगचित्रे आम्ही या अंकात समाविष्ट करीत आहोत. प्रेक्षकांना एकांकिकेचा मनमुराद आनंद लुटता यावा यासाठी आपल्या महाराष्ट्र मंडळ समितीच्या कार्यकर्त्यांनी प्रेक्षागृहाच्या बाहेर मंडळाच्या छोट्या सदस्यांसाठी चित्रकलेचे आयोजन केले होते.

बहरच्या निमित्ताने आम्ही तुम्हा सर्वांना विनंती करतो कि तुम्ही तुमच्या विचारांना चालना देऊन तुमचे लेख, कथा, कविता, शब्दकोडी, तसेच बालविश्वातील त्यांचे कलागुण अशा प्रकारचे साहित्य आम्हाला पाठवत राहा. स्वतःचे जीवन उजळवून "ज्योत से ज्योत चले" संदेश देणाऱ्या नंददीपासारखे 'आपले विचारमंथन' अखंड तेवत राहावे हीच यामागची कळकळ आहे आणि 'सहकार्याने करू उन्नती, गाऊ मायमराठी जगती' हा घोष कायम करावा हि मनोकामनाही.

हा बहर वाचकांच्या पसंदीस उतरेल अशी आशा बाळगतो. पुढील अंकात याहून अधिक लेखांची भर पडेल असे इच्छितो. आपले अभिप्राय निःसंकोचपणे आम्हाला जरूर कळवा.

(ई. पत्र - maharashtramandalad@gmail.com)

**पुढील महिन्यातील विषय :-**

स्वातंत्रदिन - माझ्या मनातील भावना

निहाल मांडके

सौ. कोमल तावडे

सौ. राधिका लपालीकर

(बहर टीम २०१४ –१५)

# भेट श्रावणधारांची

अशा बरसल्या श्रावणसरी,
अवखळ मन घेई भरारी

थेंब टपोरे पानांवरी,
मोहक गंध पृथेपरी

रिमझिम पाऊस, इंद्रधनू गहिरा
जादूगरी करी अल्लड हा वारा

पटली तुजमज आठवणींची खुणगाठ
पहिल्या पावसाच्या क्षणांनी सजली, प्रेमाची पाऊलवाट

साथ ही अपुली चिंब ओल्या क्षणांची
जीवनगाणे सुखाचे, भेट श्रावणधारांची,
........ही भेट श्रावणधारांची

डॉ.सौ.पल्लवी प्रसाद बारटके....

# प्रेम म्हणजे...

प्रेम म्हणजे  मायेचा  हाथ

जोडीदाराची साथ

कधी आणते डोळयात आसू

तर कधी ओठांवर हासू

प्रेम असत अगदी  निःस्वार्थी

त्याला नाही जगाची भिती

प्रेमात असते सुखाची चाहूल

दुःख त्याला नाही ठाऊक

प्रेमात तडजोडीचा नसतो त्रास

आनंदाचा एकच हव्यास

प्रेमात नाही तू आणि मी

फक्त आम्ही...

रचना गाडगे

# सुविचार

“सुख म्हणजे मनाची समाधानी वृत्ती होय.”

स्पष्टीकरण

आजचे युग हे तंत्रज्ञानाचे किंवा विज्ञानाचे युग म्हणुन ओळखले जाते.या युगात मानवाने आपल्या बुध्दीच्या जोरावर प्रगतीची गरुडझेप घेतली आहे.मानवाने बुध्दीचा वापर करुन नवनवीन तंत्रे विकसित केले आहेत. तसेच निरनिराळया भौतिक साधनांचा शोध लावला आहे. या सर्व सुख सोयी उपलब्ध असुनही आजचा मानव सुखी नाही. कारण त्याचे मन हे चंचल आहे. मन जोपर्यंत चंचल आहे तोपर्यंत आपणास सुख मिळणार नाही असे म्हणणे वावगे ठरणार नाही. म्हणूनच असे म्हणले आहे की,’सुख म्हणजे दुसरे तिसरे काही नसून मनाची समाधानी वृत्ती होय.

उदाहरण

एखादा शेतकरी दिवसभर शेतात काबाडकष्ट करून रात्री समाधानाची झोप घेतो म्हणजे तो शेतकरी सुखी आहे. पण या उलट वाममार्गाने पैसा मिळवणारी व्यक्ती रात्री समाधानाची झोप घेऊ शकत नाही. कारण त्याचे मन चंचल असते. ते सतत विचार करीत असते. त्याला नेहमी भीती वाटते. आपण वाममार्गाने जो पैसा मिळवला तो कशाप्रकारे मिळविला हे जर कोणाला समजले तर आपली प्रतिष्ठाही कमी होईल. असा विचार त्यांच्या मनात सतत येत असतो. असा माणूस रात्री समाधानाची झोप घेऊ शकत नाही, म्हणजे तो सुखी नाही.

तात्पर्य

मानवाचे मन चंचल आहे. हे मन जेव्हा आपल्या नियंत्रणात राहील तेव्हा आपणास समाधान लाभेल व आपण सुखी बनू.

# ही पंढरीची वारी

# जणू आनंदाची वारी ....

उन्हाची काहिली सरली आणि पावसाच्या सरी कोसळल्या की, वारकऱ्याला पंढरीच्या वारीचे वेध लागतात. खानदेशातून मुक्ताई, त्र्यंबकेतून निवृत्तीनाथ, देहूतून तुकोबा, आळंदीतून माऊली निघाली की, अवघा महाराष्ट्र तनाने नाही तर किमान मनाने तरी पंढरीच्या वारीमध्ये चालू लागतो. टाळ-मृदुंग वाजू लागले की, आपोआपच ज्ञानोबा-माऊली-तुकारामचा गजर कानात घुमू लागतो.

ज्ञानेश्वरीमध्ये 'वारी' म्हणजे येरझारा. वारकरी संप्रदायात पंढरीच्या वारीला नितान्त महत्त्व आहे. वर्षातून एकदा वारकऱ्याने पंढरीच्या विठूरायाचे दर्शन घ्यावे; असा प्रघात आहे. गळ्यांत तुळशीमाळा, कपाळी बुक्का, कानाच्या दोन्ही पाळ्यांना गोपीचंदन, खांद्यावर पताका आणि हातात टाळ मृदुंग अशा थाटात वारकरी वारीला जाताना दिसतात. पंढरपूरच्या वारीचा हा सोहळा अभूतपूर्व असतो. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचे ते एक अंग आहे.

लहानपणी आजोबा आणि आजी दोघेही आम्हा नातवंडांना एकत्र बसवून वारी, विठ्ठल, ज्ञानदेव, तुकोबा यांच्या चमत्कारांच्या कथा ऐकवत. थोडे मोठे झाल्यावर मराठीच्या युवकभारतीच्या पुस्तकांमधून कधी ज्ञानदेव, कधी नामदेव तर कधी तुकाराम आपल्या अभंगांमधून विठोबाची ओळख करुन दयायचे. नाही म्हणायला लहानपणी एकदा आईसोबत पंढरपूरला जाणं झालं होतं. तेव्हा पांडुरंगाला अगदी डोळे भरुन पाहणंही झालं होतं. त्यानंतर मात्र मनात खुप ईच्छा असूनही कधी जायला जमलंच नाही. गावाकडच्या भजनात ज्ञानदेवांचा "रुप पाहता लोचनी" आणि तुकारामांचा "सुंदर ते ध्यान" हा अभंग आला की मनातल्या मनात लहानपणी पाहिलेली ती सावळी मूर्ती नजरेसमोर आणून मनातल्या मनात नमस्कार करत असे.

मला नेहमी लहानपणी वाटायचे की मी मोठा होईपर्यंत हे पांढरे कपडेवाले, टोपीवाले राहाणार नाहीत पण आजही स्वच्छ पांढरे कपडे घातलेले लाखो लोक वारीत सामील होतात. नव्हे, त्याचे प्रमाण दिवसेंदिवस वाढतच आहे. आज सुशिक्षित, उच्चशिक्षित भाविकही वारीत सामील होताना दिसतात त्याचप्रमाणे पर्यटन आदी संस्थांचे कार्यकर्ते, स्वच्छता अभियानवाले देखील त्यांच्या दिंड्या काढतात. आज आषाढीस दिंडीत जवळ जवळ १० लाख वारकरी वय, जात-पात, लिंगभेद, दर्जा, हुद्दा न मानता पंढरपुरी येतात त्यापैकी २-३ लाख वारकरी पाऊस-पाणी, ऊन-वारा इ. गैरसोईची तमा न बाळगता, कुठल्याही सांगाव्याशिवाय वारीतून पायी पंढरपुरास येतात आणि तेही दरवर्षी न चुकता. सगळं वातावरण विठ्ठलमय झालेले असते. आपली संत परंपरा खूप मोठी आहे .सगळे संत पंढरपूरच्या विठ्ठलाच्या पायाशी जमा झाले , त्याच्या भक्तीमध्ये बुडाले.

आजच्या जमान्यातील हे सर्वात मोठे आश्चर्य नव्हे का? कारण आज बोलावूनही कोठे उपस्थित राहण्याची मानसिकता जनसामान्यांच्यात तर नाहीच पण वेळही नाही. राजकीय मेळावे तर पैशांचा पाऊस पाडून व स्वार्थासाठी (सर्वसाधारणपणे) भरवले जातात. हिमालयातील बद्रीनाथ येथे रात्री शृंगार उतरविताना पाहणाऱ्या १०० माणसांवर नियंत्रण करणं कठीण जातं. १०-१२ पट्टेवाले असूनही ७० टक्क्यांपेक्षा जास्त लोक शृंगार उतरवताना व निर्वाण दर्शन घेताना भांडताना मी पहिले आहे. त्याउलट वारीत अनेक लाखो वारकरी शिस्तीत टाळ मृदुंग वाजवीत ४-४ च्या समूहाने एकामागे एक चालत असतात. इतरवेळी अरेरावी करणारे पोलीसही त्यांना "माउली" म्हणून संबोधतात. आज सहलीला जाणार्यांपैकी काही जण राहण्याची व्यवस्था, बाथरूम (की ज्याचा १० मिनिटांवर वापर केला जात नाहीं) बघून राहायचे की नाहीं हे ठरवतात त्याचवेळी एका बाजूला लाखो वारकरी मिळेल तेथे आंघोळ करतात, कपडे धुतात व अंगावर, पाठीवर वा हातात घेवून चालत असताना वाळवतात. मिळेल तिथे नाहीतर रस्त्यावरच दुपारचा, रात्रीचा विसावा घेतात. दिवसा व संध्याकाळी मुकाम्मी काहीजण भजन कीर्तन करत दंग असतात तर काही स्वयंपाक करून पंगतीच्या व्यवस्थेत दंग राहतात. काहीही कटकट न करता स्वतःहून हे सर्व करतात.

अहो! एखादी सहल काढायची तर किती तयारी, विचार करावा लागतो जेवढी सहलीला येणाऱ्यांची संख्या जास्त तेवढा तणाव अजून वाढतो. पण वारीचं तसं नाही वारी ठराविक तिथीला निघते आषाढीला पोहचते. कोणाला निमंत्रण नाही. वर्गणी नाही. सक्ती नाही. पण विणेकऱ्याच्या भोवती दिडींचा आराखडा. रांगा किती, महिला किती, महिला वारकरी कुठं, सगळं काही ठरवल्यासारखं. 'गोपालकाल्यात' सर्वांच्या शिदोऱ्या एक करतात आणि नंतर वाटून घेतात, नकळत एकमेकांची प्रांपचिक दु:खेही वाटून घेतात.

खरच या वारी ला जाऊन ज्या गोष्टी शिकायला मिळतात, ज्या गोष्टी पाहायला अनुभवायला मिळतात त्या दुसरीकडे कुठेही मिळण शक्य नाही. मी अजून एकदाही वारी केली नाहीये, पण इच्छा मात्र खूप आहे. वारकर्यांच्या बरोबर जाउन फक्त एकदा तरी वारी करायची आहे. त्यांची भक्ती, त्यांच विठ्ठलाशी समर्पित असणं, एकमेकांना 'माउली' म्हणून पायाला हात लावून नमस्कार करणं, सगळं सगळं अनुभवायचं आहे. त्यांच्या बरोबर रांगेत उभ राहून विठ्ठलाच गोजिरवाणं रूप बघायचं आहे. पुढच्या वर्षी माझा प्रयत्न नक्की असेल, जमेल तेवढे दिवस हि आनंदाची वारी करण्याचा, हा जगावेगळा अनुभव जगुन अजूनही आपण माणुसकी असलेल्या माणसांच्या दुनियेत राहतो हि जाणीव जगण्याचा ..

निहाल मांडके

गुरुपौर्णिमा निमित्ताने वाचकांना हार्दिक शुभेच्छा!!

# गुरुपौर्णिमेचे महत्व आणि माहिती -:

आषाढ शुदध पौर्णिमेला म्हणजे या तिथीला आपण **गुरुपौर्णिमा** म्हणुन गौरवितो. आषाढ शुदध पौर्णिमेला गुरूपैर्णिमा किंवा व्यासपैर्णिमा म्हणतात. ज्यांनी महाभारतात ,पुराणे लिहीली त्या व्यासमुनींना वंदन करण्याचा त्यांची पुजा करण्याचा हा मंगल दिन आहे.त्यांच्या एवढे श्रेष्ठ गुरूजी आचार्य अदयाप झालेले नाहीत अशी आपली श्रदधा आहे. अशा या आचार्यांना साक्षात देवाप्रमाणे मानावे असे शास्त्रात कथन केले आहे. एवढेच नव्हे तर महर्षी व्यास हे भारतीय संस्कृतीचे शिल्पकार आणि मुलाधार मानले जात. ज्या ग्रंथात धर्मशास्त्र नीतिशास्त्र, व्यवहारशास्त्र, मानसशास्त्र आहे. असा सर्वश्रेष्ठ ग्रंथ त्यांनी लिहिला.ज्ञानियांचा राज म्हणून ज्याला मानतात त्या ज्ञानदेवांनीसुध्दा ज्ञानेश्वरी लिहिताना 'व्यासांचा मागोवा घेतू असे म्हणून सुरूवात केली.

व्यासपैर्णिमेच्या दिवशी 'ओम नमोस्तुते व्यास विशाल बुदधे अशी प्रार्थना करून त्यांना प्रथम वंदन करण्याचा परंपरा आहे. आपल्या देशात रामायण महाभारत काळापासुन गुरू शिष्य परंपरा चालत आली आहे. आपण ज्यांच्याकडुन विदया प्राप्त करतो मिळवतो त्याच विदेच्या बळावर आपण सर्वांचा उदधार करीत असतो. अशा या गुरूंना मान देणे आदराने कृतज्ञता व्यक्त्त करणे हे आपले आदय कर्तव्य होय. महर्षी व्यासांपासून अशी प्रथा रूढ झाली ती आजमितीपर्यंत.

आपण कोणाचे तरी शिष्य आहोत या भावनेत एक कृतज्ञता वाटते.भारतीय गुरूपरंपरेत गुरू शिष्यांच्या जोडया प्रसिदध आहेत. जनक याज्ञवल्क्या, शुक्राचार्य जनक, कृष्ण सुदामा सांदिपनी, विश्वामित्र राम लक्ष्मण ,परशुराम कर्ण, द्रोणाचार्य अर्जुन अशी गुरू शिष्य परंपरा आहे. मात्र एकलव्याची गुरूनिष्ठा पाहिली की सर्वांचेच मस्तक नम्र झाल्याशिवाय राहत नाही.

भगवान श्रीकृष्णांनी गुरूच्या घरी लाकडे वाहिली. संत ज्ञानेश्वरांनी वडीलबंधू निवृत्तीनाथ यांनाच आपले गुरू मानले तर संत नामदेव साक्षात विठ्ठलाशी भाष्य करीत असत.त्या नामदेवांचे गुरू होते विसोबा खेचर. भारतीय संस्कृतीत गुरूला नेहमीच पूजनीय मानले आहे.**गुरूपौर्णिमा** ही सदगुरूंची पैर्णिमा मानली जाते. **पौर्णिमा** म्हणजे प्रकाश गुरू शिष्याला ज्ञान देतात. तो ज्ञानाचा प्रकाश आपल्यापर्यंत पोहोचावा म्हणुन गुरूची प्रार्थना करावयाची तो हा दिवस होय.

गुरू म्हणजे ज्ञानाचा सागर आहे. जलाशयात पाणी विपुल आहे परंतु घटाने घागरीने आपली मान खाली केल्याशिवाय म्हणजे विनम्र झाल्याशिवाय पाणी मिळु शक्त नाही. त्याप्रमाणे गुरूजवळ शिष्याने नम्र झाल्याविना त्याला ज्ञान प्राप्त होणार नाही हे सर्वांना लक्षात ठेवावे. 'गुरू बिना ज्ञान कहासे लाऊ' हेच खरे आहे.

गुरूंच्या उपकारांनी आपले मन कृतज्ञतेने भरून येते तेव्हा आपल्या तोंडुन श्लोक बाहेर पडतो

**गुरूर्ब्रम्हा गुरूर्विष्णु गुरूर्देवो महेश्वरः!!**

**गुरू साक्षात परब्रम्ह तस्मै श्री गुरवे नमः !!**

**संदर्भ :** सनातन संस्थानिर्मित ग्रंथ 'सण धार्मिक उत्सव व व्रते.'

अनेक विदयालयांतून महाविदयालयांतून श्रदधाशील विदयार्थी आपापल्या गुरूजनांसमोर या दिवशी विनम्र भावनेने नतमस्तक होतात. वेगवेगळया पंथोपपंथांतून ईश्वरभक्तीकडे जाण्याचे मार्ग शोधणारे मुमुक्षू पारमार्थिक या दिवशी आपल्या गुरूंचे भक्तिभावाने पूजन करतात. ज्यांना या ना त्या कारणांमुळे गुरूंचे समक्ष दर्शन वा सहवास घडू शक्त नाही ते त्यांच्या प्रतिमेची  पूजा करतात.



# आय टू हॅड अ लव स्टोरी

लेखक: रविंदर सिंग

प्रकाशक: पेग्विन मेट्रो रीड्स

पाने : २०६

प्रकाशन : सन २०१२

लेखक रविंदर सिंग यांचे हे पहिले पुस्तक आहे आणि असे म्हणतात की ही कादंबरी लेखकाच्या जीवनातील सत्य घटनांवर आधारीत आहे.

ही रविन या युवकाने सांगितलेली त्याची आणि खुशीची प्रेमकथा आहे. ते दोघे एकमेकांना इंटरनेट वरील लग्नेच्छुकांसाठीच्या संकेतस्थळावर म्हणजे वेबसईटवर भेटतात. वेगवेगळ्या शहरांमध्ये रहात असल्याने ते एकमेकांशी दूरध्वनीवरून बोलायला लागतात. हळूहळू फोनवरच्या ओळखिचे रूपंतर मैत्री मध्ये आणि मैत्रीचे रूपंतर प्रेमात होते. ऋाऱ्यााटा एकमेकाला न पहात आणि न भेटत दोघेजण लग्न करायचे ठरवतात आणि आणाभाकापण घेतात.

मग एकदा ठरवून ते भेटतात एकमेकांना भेटण्याची अतुरता ुत्कंठा हुरहुर वेडेपणा. एकमेकांकडून अेणा आणि आपल्या प्रेमाची खात्री पटवून द्यायची धडपड.प्रेमी युगलचा मुर्खपणा. या सर्व गोष्टी लेखकाने सुंदररित्या टिपल्या आहेत.प्रेमात ासाध्यासध्या गोष्टी अचानक महत्वाच्या बनतत थोड्या वेळासाठी एकांत ामिळावा म्हणून खोटे बोलायला लागणे. रविनला देशाबाहेर जायला लागल्यामुळे झालेली निराशा आणि विरह.ानिरलस प्रेमाची ुदात्त भावना. ऱ्यांच्यात घडत गेलेले बदल. या सर्व गोष्टी लेखकाने क्लिष्ट भाषा न वापरत प्रमाणिकपणे आणि परिणामकारकरिऱ्या मांडल्या आहेत.

ऱ्यांच्या साखरपुड्याची तयारी सुरु होतेआणि कथेमध्ये एक मोठा पेच निर्माण होतो आणि आपण मुळापसून हदरुन जातो. वाचक विचार करायला लागते की असे का झाले? नशिबाने त्यांच्यावर असा वार का केला? त्यांच्या वट्याला असे भोग का आले?

रविंदर सिंग यांनी कथा सरळ आणि सोपी ठेवलेली आहे. उगिचच भावनाोभाचा अंतर्भाव करुन कथा नाट्यमय करण्याचा मोह त्यांनी टाळला आहे. त्यामुळेच ही कथा आपल्याला ऋदयाला स्पर्श करते आणि खरी वाटते लेखकाने कथा वास्तवदर्शी साधेपणाने आणि समर्पक पणे मांडली आहे. प्रेमाचे प्रसंग लेखकाने सुंदररित्या चितरले आहेत. कथेतल्या पेचानंतर कथा थोडीशी रखडल्यासारखी वटतेपण लवकरच लेखक कथेला परत सावरुन घेतो.

तुम्हाला पुस्तकआवडेल. कथेतल्या पत्रांबरोबर तुम्ही सुख दुःख अनुभवत. पण तुम्ही कथेतील एकपत्र बनत नाही. इन्फोसिसच्या नारायण मुर्तींनी या पुस्तकाचे वर्णन साधे,प्रामाणिक आणि भावनास्पर्शी असे केले आहे. मी त्यांच्या मताशी सहमत आहे. रविंदर सिंग यांच्याकडून आणखी चांगल्या लिखाणाची अपेक्षा करायला हरकत नाही.उत्तम नसलं तरी छान पुस्तक.प्रेमकथा आवडणाऱ्यांनी खरच वाचावे.




श्री. मंदार आपटे

# छायाचित्रण - एक कला

नमस्कार मंडळी....

गेलेली वेळ किंवा गेलेले क्षण कधीच परत येत नाहीत, हे आपण अगदी लहानपणापासुनच ऐकत, वाचत आलो आहोत. हे अगदी १००% खरं आहे. आणि म्हणुनच की काय माणसाने ते क्षण, त्या आठवणी पुन्हा ताज्या व्हाव्यात यासाठी छायाचित्रण कला अवगत केली असावी, कॅमेराची निर्मीती केली. आणि त्याच्या रुपाने माणुस गेलेले क्षण, आठवणी पुन्हा पुन्हा अनुभवु लागला.

असे क्षण आपल्या कॅमेरामध्ये बंदिस्त करुन ठेवावे असे आपल्यातल्या प्रत्येकालाच वाटत असते. प्रत्येकजण आपापल्या परीने तसा प्रयत्न करत असतो. असे प्रयत्न चालु असतानाच आपण अनेकांच्या तोंडुन वेगवेगळे संवाद ऐकत असतो. "अरे, माझ्याकडे SLR नाही ना.. नाहीतर यावेळचे फोटो छान आले असते..".. किंवा "काय गं सांगु.. कालच्या आपल्या किटी पार्टीचे फोटो किती ब्लर आलेत.." किंवा " अरे यार.. या कॅमेराने रात्रीच्या वेळचे फोटो खुपच गडद येतात रे..." असे एक ना अनेक...

अनेक छायाचित्रे पाहिली की आपल्याला आनंद होतो. अनेकदा असं वाटून जातं की मी इतके सुंदर छायाचित्र काढू शकतो का? कसे काढले असेल? कोणता कॅमेरा वापरला असेल?
मी सुद्धा एक कॅमेरा घेतो/घेते आणि सुरु करते. पण कोणता घ्यावा? फिल्म की डिजीटल? पॉईंट अँड शुट की एसएलआर? यात नेमका फरक काय? ऍपर्चर म्हणजे काय? असे अनेक प्रश्न आपल्याला पडतात. याचसारख्या प्रश्नांची उत्तरे शोधण्यासाठी, माहितीची देवाणघेवाण करण्यासाठी, या कलेची अनेक अंगे समजून घेण्यासाठी आणि छायाचित्रे-छायाचित्रणा आनंद लुटण्यासाठी हा लेखप्रपंच.

कुठलीही गोष्ट 'करायची' म्हणजे त्यात थोडं तंत्र, थोडी कला येतेच, अगदी गाडी चालवण्यापासून ते गिटार वाजवण्यापर्यंत. यात छायाचित्रणही आलंच. त्यातली कला जरी आतूनच आली पाहिजे, तरी तंत्र शिकणं प्रत्येकाच्या हातात आहे.

या लेखमालेत आपण कॅमेरा आणि छायाचित्रणाच्या कलेबद्दल थोडेफ़ार जाणुन घेण्याचा प्रयत्न करणार आहोत. खरं तर माझं ज्ञान छायाचित्रणासारख्या व्यापक विषयावर लिहावे इतके नक्किच नाही. पण माझा (थोडासा) अनुभव तुमच्या उपयोगी आला तर मला आनंदच वाटेल. कदाचित या लिखाणामुळे आणि त्यानंतरच्या आपल्या अपेक्षीत प्रतिक्रिया, सुचना यामुळे माझ्याच ज्ञानात भरच पडेल. इथे आपल्यासमोर मांडत असलेली माहिती ही काही प्रमाणात स्वानुभव, छायाचित्रकार मित्रांसोबत चर्चा आणि बरयाच प्रमाणात इंटरनेटवरील वाचन व व्हिडीओज बघुन आत्मसात केलेली आहे. तेव्हा या लेखांवर आपल्या प्रतिक्रिया, सुचना यांचे स्वागत आहे.




## कॅमेरा खरेदी

आपण जेव्हा कॅमेरा खरेदी करण्याचे ठरवतो तेव्हा बाजारात उपलब्ध असलेल्या असंख्य पर्यायांमुळे खरेच गोंधेळुन जातो. यावेळी हे लक्षात ठेवले पाहिजे की सर्वप्रथम छायाचित्रण महत्वाचे आहे आणि त्यासाठी लागणारे साधन नंतर. शेवटी फोटो आपल्याला काढायचे असतात.

बऱ्याच जणांचा असा गैरसमज असतो की आपल्याकडे चांगला मोठा, लेन्स असलेला DSLR वगैरे असेल तरच आपण काढलेले फोटो चांगले येतील. पण मुळात छायाचित्रणाची आवड पाहीजे. नाहीतर कोणीही कितीही महागतला कॅमेरा घेतला आणि वापरायचा कसा हे माहीत नसेल तर फोटो काढणाऱ्याच्या आणि पहाणाऱ्याच्याही पदरी निराशाच येते. याचबरोबर कॅमेरा, लेन्स, ट्रायपॉड आणि इतर अनेक accessories सोबत घेउन हायकिंग, ट्रेकिंग करणे म्हणजे एक दिव्यच असते.

याचा अर्थ SLR घेऊ नये असा नक्कीच नाही, तर आपल्याला वापरता येईल असा सुयोग्य कॅमेरा घ्यावा असा आहे.

कॅमेरा घेण्याआधी सर्वप्रथम आपल्याला कोणत्याप्रकारचे छायाचित्रण करायचे आहे हे निश्चित केले पाहीजे. हौशी की व्यावसाईक? आणि मग त्यानुसारच कोणता कॅमेरा विकत घ्यायचा हे ठरवावे. इथे आपण फ़क्त हौशी छायाचित्रणाबद्दल चर्चा करु.

बऱ्याच वेळा असं घडत कि आपल्याला कुठेतरी नवीन ठिकाणी जायचं असतं किंवा एखादा महत्वाचा कार्यक्रम असतो. आणि अगदी शेवटच्या क्षणी आपण कॅमेरा खरेदी करतो. मग कॅमेरा वापरायचा माहीत नसला तर मनस्ताप होतो, आणि मग त्या क्षणांचे, नवीन ठिकाणाचे धड फोटोही येत नाहीत. त्यावेळी हा कॅमेरा घेऊन आपण चुक तर नाही ना केली, हा सफ़ेद हत्ती तर पोसावा लागणार नाही ना अशा नाना कुशंका मनात येऊ लागतात.
म्हणून नवीन कॅमेरा घेताना जरा या बाबींकडे लक्ष देणं जरा गरजेचं आहे.

## तुमच्या कडे कॅमेरा कधीच नव्हता आणि आता पहिल्यांदाच घ्यायचाय?

मग साधा फिल्मचा पॉईंट एन्ड शूट कॅमेरा सुद्धा चालेल. कोणत्याही घरगुती प्रसंगाचे ट्रीपचे फोटो नीट काढता येतात वापरायला सोपा एकदम. फिल्म असल्याने फोटो काढून झाले कि फिल्म डेव्हेलेप्मेंटला स्टुडीयोमध्ये दिली कि काम झालं.
तुम्हाला कॉम्प्युटर वापरता येत नसला तर फिल्मवाला कॅमेरा उत्तमच.फक्त फिल्मवाला कॅमेरामध्ये काढलेले फोटो डेव्हेलप झाल्याशिवाय कसे आलेत ते कळत नाही.
डीजीकॅम सुद्धा पॉईंट एन्ड शूट भागातच येतो. पण डीजीकॅम घेतलात तर तुमच्याकडे कॉम्प्युटर असणे आणि तो नीट वापरता येणे जरुरीचे आहे. डीजीकॅम मध्ये काढलेले फोटो मागेच डीजीकॅमच्या स्क्रीन वर बघता येतात हा सगळ्यात महत्वाचा फायदा. नवीन डीजीकॅममध्ये बरयाच सोई पण असतात. म्हणजे टच स्क्रीन, ओटो फोकस, ओटो फ़्लॅश इ. बरेच काही.
Canon Cybershot, Sony ixy, Nikon Coolpix, Casio यातले नवीन मॉडेल बघुन घेता येईल. घेताना जरा मेमरी कार्डकडे लक्ष द्या. सोनी साठी स्पेशल कार्ड लागतात ते महाग असतात. बटरीकडे लक्ष द्या, काही काही मध्ये आपले पेन्सिल सेल पण चालतात. त्याना वेगळा चार्जर लागत नाही.
अजून वरच्या ऑप्शन मध्ये एस एल आर लाईक कॅमेरा पण येतो. हा एस एल आर सारखा दिसतो. पण याच्या लेन्स बदलता येन नाहीत. हलका असतो. तरीही याची रेंज बरीच असते म्हणजे जवळचे लांबचे असे फोटो काढता येतात (10X zoom, 18x zoom etc). हे कॅमेरे जरा महाग असतात.
यातहि बरीच नवीन मॉडेल असतात याची काही उदाहरणे म्हणजे Panasonic Lumix, Panasonic FZ,Canon S5 IS,Canon PowerShot, Nikon P80,Sony H50,Olympus SP-590

## तुमच्या कडे पॉईंट एन्ड शूट कॅमेरा आहेच पण एक एस एल आर पण घ्यायचाय, असाच केव्हातरी वापरायला.

हौसेला मोल नसत असं म्हणतात. हे सिद्ध करायचे असेल तर SLR नक्की घ्या. एस एल आर कि डिजीटल एस एल आर हे सर्वस्वी तुमच्या कॉम्प्युटर वापरता येण्यावर, आणि बजेटवर अवलंबून आहे. कॅनन आणि निकॉन दोन्ही मल्टि-बिलियन डॉलर ऑप्टिकल कंपन्या आहेत (ऑप्टिकल कंपनी हा मुद्दा खूप महत्त्वाचा आहे) आणि या दोन्ही कंपन्या गेल्या कित्येक दशकांपासून असंख्य ग्राहक, सुरक्षादले व औद्योगिक उपयोगांसाठी जगातले सर्वात उच्च दर्जाचे ऑप्टिकल साहित्य बनवत आल्या आहेत. दोन्ही मध्ये चांगले कॅमेरे आहेत आणि लेन्स पण आहेत तुम्ही शक्यतो कंझ्युमर सिरीज मधले कॅमेरे बघा. हे सगळ्यात स्वस्त रेंज मध्ये उपलब्ध असतात. कंझ्युमर सिरीजमध्ये कॅमेऱ्याबरोबर एक लेन्सहि किट मध्ये असते त्यामुळे खरेदी सोपी आणि स्वस्त पडते.

## तुमची मुळ आवड फोटोग्राफी नाही पण कॅमेरा तुमच्या छंदामध्ये उपयोगी आहे

ट्रेकिंग, कयाकिंग, हायकिंग अस काही छंद असेल तर डीजीकॅम बेस्ट आहे. तो इतका लहान असतो ती बाळगण्याचा त्रास होत नाही.
पण जर झूम वैगेरे हवे असेल तर आधी सांगितल्याप्रमाणे एस एल आर लाईक कॅमेरा घेता येईल.

हलका असल्याने नेणे खूप त्रासाचे नाहीये, आणी लेन्सचा पसारा पण न्यायला लागत नाही.

**तुम्हाला फोटोग्राफीची खूप हौस आहे आणि फोटोग्राफी शिकायची आहे. सध्याचा पॉईंट एन्ड शूट ने क्रिएटिव्ह फोटोग्राफी करता येत नाहीये.**

तुमच्याकडे जर आधीच एक एस एल आर असेल तर तुम्हाला सुरुवातीला काहीही घ्यायची गरज नाही. नसेल तर मात्र आधी बजेट ठरवा. जर ते खूप कमी असेल तर फिल्म एस एल आर घेणे उत्तम. काही जुने मॉडेलचे पूर्ण मेकॅनिकल कॅमेरे खुप स्वस्त मिळू शकतात. यात सगळे कंट्रोल तुम्हालाच ठरवायला लागतात यामुळे सुरुवातीला चांगले फोटो येणे जड जाते. फोटोग्राफीची खरच आवड आणि लाईट, शटरस्पीड याबद्दल खूप काही शिकावं लागत पण जे शिकाल ते अगदी पक्क होऊन जाईल.
आता जवळपास सगळे एस एल आर कॅमेरे ऑटो आणि मॅन्युअल मोड असलेले असतात. यामुळे अगदी काही येत नसेल तरी ऑटो मोड मध्ये फोटो काढता येतात. पण असं केलं तर खरतर यात आणि पॉईंट एन्ड शूट मध्ये मग फार फरक रहातच नाही.
फिल्म कॅमेऱ्याचा एक तोटा असा कि फिल्म डेव्हलपमेंटचा खर्च, आणि ठेवायची जागा.

सहसा या वेळी जो कॅमेरा घेतला जातो तोच ब्रँड नंतरहि वापरण चालू राहतं. कारण त्या अनुषंगाने आपण इतर लेन्स इ. हळूहळू खरेदी करतोच. त्यामुळे तुमचा काही चॉइस असा असेलच तर त्या कंपनीचा घ्या. पण जर पुढे तुम्हाला काही स्पेशालिटी करावीशी वाटली तर ब्रँड बदलताही येतो त्यामुळे खूप काळजी करून नका.
बजेट जास्त असेल तर डिजीटल एस एल आर घेता येईल
Nikon D3000,Nikon D90, Nikon D6,
canon EOS 20D, 30D, 40D, 5D, 350D
असे बरेच ऑप्शन आहेत आणि दरवर्षी नवीन येत असतात.

डिजीटल एस एल आर घेताना लक्षात ठेवायची एक खूप महत्वाची गोष्ट म्हणजे तुम्ही फोटो काढलेत कि ते कॉम्प्युटरवर डाउनलोड करावे लागतात. त्यानंतर ते प्रोसेस म्हणजे raw format मधून jpg मध्ये convert करावे लागतात.
हे त्रासदायक वाटत असेल तर फोटो काढतानाच jpg काढण्याचा एक ऑप्शन असतो कॅमेऱ्या मध्ये तो चालू करून ठेवावा.

**तुमच्या कडे एक एस एल आर कॅमेरा आहेच पण आता अपग्रेड करायचाय**

इथे मात्र तुम्हाला बराच विचार करावा लागेल. सगळ्यात महत्वाचं म्हणजे तुम्हाला अपग्रेड का करायचंय?
म्हणजे "माझ्या मित्राकडे हा नवीन कॅमेरा आहे त्याने मस्त येतात त्याचे फोटो. माझ्या कॅमेऱ्याने येत नाहीत म्हणून मला त्याच्याकडे असलेलाच कॅमेरा घ्यायचा आहे" अस काहीसं वाटत असेल तर ते म्हणजे नाचता येईना... असं आहे.
जर तुम्हाला तुमचे फोटो चांगले येत नाहीत असे वाटत असेल तर कॅमेरा बदलून काहीच उपयोग

नाही. कारण त्या नवीन कॅमेऱ्याच्या मागे उभे रहाणारे तुम्ही जुनेच असणार. त्यापेक्षा ते पैसे फोटोग्राफीच्या कोर्स किंवा पुस्तकांसाठी साठी घाला. तुमचं नक्की कुठे चुकतं ते माहिती करा.

जर तुम्हाला तुमच्या कॅमेऱ्या मधल्या त्रुटी जाणवायला लागल्यात आणि त्यामुळे फोटो काढताना अडचण होतेय असा वाटल कि मात्र बदलण गरजेच ठरतं. अशा वेळी नवीन कॅमेरा म्हणजे नवीन बाजारात आलेलं मॉडेलच असेल असा नाही. तुमच्या गरजेला जे योग्य असेल ते मॉडेल घ्यावं. म्हणजे तुम्हाला स्पोर्ट्स फोटोग्राफी आवडते आणि तुमच्याकडे आत्ता असलेल्या कॅमेराने छान फोटो येतात पण बऱ्याचवेळा नेमका हायलाईट निसटून जातोय कारण कॅमेरा एवढा चपळाईने (३ फ्रेम पर सेकंद) फोटो काढू देत नाही. मग तुम्हाला ज्या कॅमेऱ्या मध्ये जास्त फ्रेम पर सेकंद असतात असा कॅमेरा घेणे उपयुक्त ठरेल.
किंवा तुम्हाला बर्ड फोटोग्राफी आवडते तुमच्याकडे असलेल्या कॅमेराने ही फोटो मस्त येतायेत. पण तुमचा फोकस खूप वेळा बरोबर येत नाही. नीट फोकस राहिला तर अजून छान फोटो येतील अशा वेळी नवीन आलेला 51 point focus आणि focus followup वाला कॅमेरा घेण फायद्याच होईल.
अगदी तुम्हाला खांद्याला इजा झालीये आणि तुम्ही जड कॅमेरे उचलू शकत नाही अशावेळी वजनाने हलके असलेले कंझ्युमर कॅमेरा घेताना वाईट वाटू नये.
असे अपग्रेड करताना बहुतेकदा प्रोझ्युमर कॅमेरे किंवा प्रोफेशनल कॅमेरे मध्ये केले जाते.
अजून एक अपग्रेड करायचं कारण म्हणजे डीजीटल वर्ल्ड मधले मेगापिक्सेल
नवीन १०मेगापिक्सेल कॅमेरा आला कि आधीचा ८चा सोडून तो घ्यायचा मग १२ चा आला कि परत बदलायचा. खरतर तुम्ही तुमचे फोटो कुठेही विकत नसाल, किंवा A4 पेक्षा मोठ प्रिंटही काढत नसाल तर ८ मेगापिक्सेलच्या वर धावायची गरज नाहीये.

आता हे एवढ लिहण्याने तुमच्या ज्ञानात भर पडली कि गोंधळात ते माहीत नाही. पण हि माहिती कुठेतरी, कोणालातरी उपयोगी होईल हि अपेक्षा.
कुठलाही कॅमेरा घ्या,पण तो हातात आल्यावर पहिली गोष्ट कुठली कराल तर त्याचे manual किमान चार वेळा वाचून काढा. आगदी पाठ केलात तरी चालेल.
त्यानंतर काय कराल तर कॅमेऱ्याची सगळी बटन कुठे कुठे आहेत ते नीट बघा. हे इतक छान आलं पाहिजे की अंधारात कॅमेरा हातात असेल तरी न बघता नुसत हातांना कळलं पाहिजे कुठचं बटन कुठं आहे ते.

कंझ्युमर कॅमेरा म्हणजे जे सगळे सहज वापरू शकतील, वजनाला हलके ( plastic body) कॅमेरे. यात सर्वसामान्य ग्राहकांच्या गरजा पूर्ण करण्याचा प्रयत्न असतो. सेन्सर साईज छोटा असतो त्याला APS-C किंवा Crop body (कॅमेऱ्याच्या बोलीभाषेत ) असं पण म्हणतात.

प्रोझ्युमर कॅमेरा म्हणजे ज्यांना फोटोग्राफीची खूप हौस आहे थोडीफार फोटोग्राफीची येतेही. हे अगदीच नवशिके नसतात अशांसाठी असलेले कॅमेरे. यातले कॅमेरे जड Magnesium alloy body असलेले, थोडफार weather sealing असलेले, सहसा जास्त फ्रेम पर सेकंद असलेले असे असतात.फुल फ्रेम सेन्सर किंवा APS-C. किमतही जास्त असते.

प्रोफेशनल कॅमेरा म्हणजे ज्यांचा फोटोग्राफी हाच व्यवसाय आहे त्यांच्यासाठीचे कॅमेरे. किमत खुपच जास्त असते. Magnesium alloy body, weather sealing असतेच. पण आणखी स्पेशालिटीसुद्‌धा असतात (vertical grip, १००% viewfinder, फुल फ्रेम सेन्सर ).

पुढील लिंकवर आपल्याला वेगवेगळ्या आणि नविन कॅमेऱ्यांची माहीती मिळेल.

http://www.dpreview.com/products/cameras?utm_campaign=internal-link&utm_source=mainmenu&utm_medium=text&ref=mainmenu




अजय पडवळ

ajay.padwal@gmail.com

क्रमशः

# अब्दुल कलाम आणि नेतृत्व

आपण सगळे A P J अब्दुल कलाम यांना ओळखतो ते एक अत्यंत बुद्धिमान, हुशार शास्त्रज्ञ म्हणून. तसेच सर्वांचे आवडते आणि आदरणीय राष्ट्रपती म्हणून.

एका मुलाखती दरम्यान त्यांनी उत्कृष्ट नेतृत्वाबद्दल बोलताना सांगितले कि त्यांच्या भाग्याने त्यांना सर्वोत्कृष्ट लोकांबरोबर काम करायला मिळाले. अशी माणसे ज्यांनी स्वतःचा आचरणातून दुसर्यांना धडे घालून दिले. त्या संदर्भात त्यांनी सांगितलेला एक हृद्यस्पर्शी किस्सा (स्वानुभव)मला तुम्हा सर्वाना सांगायला आवडेल.

साधारण १९७३ दरम्यान अब्दुल कलाम यांना SLV-३ (Satellite launch vehicle program) चे प्रोजेक्ट डायरेक्टर बनवले गेले. प्रोजेक्टचे उद्दिष्ट होते १९८० पर्यंत " रोहिणी " उपग्रह अवकाशात त्याचा कक्षेत सोडणे. त्यांना पुरेशी टीम आणि आर्थिक पाठबळ दिले गेले. झाले! उदिष्ट साध्य व्हायला टीम चे हजारो लोक धडाडून कामाला लागले.

साधारण १९७९ च्या ऑगस्ट महिन्यात कलामांना विश्वास वाटला कि उपग्रह प्रक्षेपित करायला लागणारी सर्व तयारी जवळ-जवळ पूर्ण झाली आहे. आणि आपण वेळेआधीच आपले उदिष्ट पूर्ण करू शकतो.

कलामांनी त्यांचा प्रमुखांना प्रो. सतीश धवन यांना, जे इंडियन स्पेस रिसर्च सेंटरचे चेअरमन होते, त्याप्रमाणे रिपोर्ट दिला. आन्ध्र प्रदेशातील श्रीहरीकोटा येथून सकाळी ७ वाजता प्रक्षेपनाची वेळ ठरली. धवन यांनी प्रसार माध्यमांना बातमी दिली. सर्व देशाच्या नजरा प्रक्षेपणाकडे लागल्या. कारण भारत मातेच्या मुकुटात अजून एक शिरपेच जडणार होता

ठरलेल्या दिवशी सकाळी ६ पासून जगभरातील बातमीदार, मेडिया श्रीहरीकोटा येथे उपस्थित झाले.कलाम प्रक्षेपणाचे उर्वरित कृती करण्यासाठी कंट्रोल रूम मध्ये आले आणि मुख्य कॉम्पुटर चालू केला. नियमित प्रोग्राम झाल्यावर लौंच होण्याचा 5 मिनिटे आधी कॉम्पुटरने शेवटची चेकलिस्ट तपासायला सुरुवात केली. तपासणी सुरु झाल्यानंतर १ मिनिटात वार्निंग दिवा लागला, आणि कॉम्पुटर ने प्रोग्राम होल्ड केला. वार्निंग होती कि कुठलातरी कंट्रोल करणारा घटक हवा त्या प्रमाणात नाहीये. कलामांबरोबर ४-५ तज्ञ मंडळी होती, त्यांनी खात्री दिली कि त्यांचे गणिती अनुमान बरोबर आहेत आणि आपण या

वार्निंगकडे दुर्लक्ष करू शकतो. चर्चे-अंती कलामांनी निर्णय घेतला. "ऑटो मोड ऐवजी मन्युअल मोड सिलेक्ट केला आणि "START" बटन दाबले. पहिला टप्पा व्यवस्थित पार पडला. आणि दुसर्या टप्प्यात काही तरी बिघाड झाला आणि केवळ उपग्रहच नव्हे तर उपग्रह धारण करणारी आख्खी सिस्टम बंगालच्या उपसागरात पडली.

आता प्रेसला संबोधित करण्याची वेळ आली. प्रोजेक्ट डायरेक्टर म्हणून या अपयशाची जबाबदारी कलामांची होती. त्यांनी प्रेसला तोंड देण्याची मनाची तयारी केली. प्रेसला संबोधित करण्यासाठी स्टेजवर जावू लागले. एवढ्यात कोणीतरी त्यांचा हात धरून मागे खेचले. हात खेचणारे गृहस्थ होते श्री सतीश धवन. "इथेच थांबा!" असे म्हणून धवन एकटेच स्टेजवर गेले. प्रेसला संबोधताना ते म्हणाले "इंडियन स्पेस रिसर्च सेंटरचा चेअरमन म्हणून मी या पराभवाची जबाबदारी स्वीकारतो. माझ्या टीमने गेली ६ वर्ष कठोर मेहनत घेतली आहे, तरीही तांत्रिकदुष्ट्या थोडे अजून काम करावे लागेल. तरी मी आपणास खात्री देतो कि पुढील वर्षी आधी ठरल्याप्रमाणे आपण उपग्रह अवकाशात सोडूच सोडू."

त्यांचा या सकारात्मक भाषणाने आणि अपयशाला पाठीशी घातले गेल्याने कलामांना भरून आले. सगळी टीम पुनश्च एकदा झपाटून कामाला लागली. आणि १९८० मध्ये भारताचा "रोहिणी उपग्रह अवकाशात ठरलेल्या कक्षेत भ्रमण करू लागला.

पुन्हा एकदा प्रेस कॉन्फरन्सला सामोरे जाणे आले. कलामांनी विचार केला की माझ्या मागील अपयशाची जबाबदारी धवनांनी आपल्या अंगावर घेतली त्यामुळे आजचा यशाचे श्रेयही त्यांचेच आहे म्हणून धवानांनीच प्रेस कॉन्फरन्सला सामोरे जाने योग्य राहिल. ते असा विचार करत करत मागे सरकतच होते. तेवढ्यात धवन आले. त्यांनी कलामांचा खांद्यावर हात ठेवला. त्यांना किंचित ढकलतच स्टेज वर आणले. प्रेसवाल्यांनी प्रश्नोत्तरे सुरु करण्या आधीच त्यांच्या काही लक्षात येण्याआधी धवनांनी जाहीर केले की “आजचा यशाचे मानकरी आहेत APJ अब्दुल कलाम. यांचा नेतृत्वाखालीच आमच्या टीमने हे नेत्रदीपक यश मिळवले. त्यामुळे तुमचा सर्व प्रश्नांची उत्तरे तेच देतील.”कलाम दिग्मूढ झाले. काही बोलणार एवढ्यात प्रश्नोत्तरे सुरु झाली होती. उत्तरे देता देता त्यांनी वळून विंगेत पहिले तर धवन त्यांच्याकडे बघून प्रसन्नपणे तोंडभरून हसत होते

- देवेंद्र सदाशिव भागवत

# Father's Day

Father's Day festival is considered extremely important as it help acknowledge the contribution of fathers to individual families and to societies as large. Besides observance of Father's Day provide children an opportunity to express love and respect for their fathers. The sentiment goes a long way in strengthening father-child relationship and consequently in the emotional development of a child.

## History of Father's Day

The idea of celebrating Father's Day Festival was given by Ms Sonora Dodd, a loving daughter from Spokane. Her father Henry Jackson Smart single-handedly raised Sonora and five of her siblings after the death of her mother during childbirth. When Sonora attended a Mother's Day Sermon in 1909, she thought that if there is the day to honor mother then there should also be a corresponding day to honor fathers. Sonora worked relentlessly for years to ensure that the idea of Father's Day becomes a reality. In 1924 President Calvin Coolidge first recognized Father's Day. In view of the massive popularity of the festival, in 1972, President Richard Nixon established a permanent national observance of Father's Day to be held on the third Sunday of June.

Over the years, the concept of celebrating Father's Day spread beyond geographical boundaries. Today, millions of children across the world express gratitude for their dads as they celebrate Father's Day festival.

## Significance of Father in our Lives

Many people laughed at Sonora Dodd when she gave the concept of having a Father's Day, as traditionally, only mother is regarded as the sole nurturer of a child. The role of father is often relegated to a secondary status as compared to a mother. But all of us know that father is just as important for a child as the mother is. If mothers are the heroes of child rearing, significance of father in the development and emotional well-being of a child is no less.

Children depend on their father for their spiritual, emotional, physical,

financial and social well-being. For daughters, father is the ideal man in the world and also the first man they adore, while for sons, father is an idol and the strongest man they aspire to emulate.

Though traditionally father is seen more as a provider and guide for children, the scenario appears significantly changed in nuclear family culture of today. With most husband and wife working, fathers in present times are as involved in child rearing job as the mothers are. Today, most fathers do not shy away from changing nappy or taking the difficult task for putting the baby to sleep. This cultural change is helping in strengthening father-child relationship and consequently in emotional development of a child and building of stronger family bonds.

## Significance of Father's Day Festival

Father's Day festival gives us the opportunity to express thanks to our Daddy for all their unconditional love and affection. Observance of Father's Day makes fathers feel that their contributions are acknowledged in the society and also by their children.

Ulka Nandedkar

# देवापुढे काढायची रांगोळी

१) सोमवार-- गुलाबी रंग



या रांगोळी ने विघ्न दर होतात, प्रगती होते आणि

चंद्रा ची पूजा केल्याचे पूण्य लाभते.

२)मंगळवार— शेंद्री रंग



या रांगोळी ने संपत्ती प्राप्त होते आणि शास्त्राचे ज्ञान प्राप्त होते

3) बुधवार--- लाल रंग



या रांगोळी ने पत्नी प्रेम वाढते आणि घरात सूख शांती लाभते.

४) गुरुवार— लाल, हिरवा



या रांगोळी ने संपत्ती प्राप्त होते आणि गुरू ग्रहाच्या पूजनाचा लाभ मिळतो.

५) शुक्रवार— शेंद्री रंग



या रांगोळी ने मुलामुलींचे विवाह योग्या ठिकाणी होतात. जोडीदार चांगला लाभतो.

६) शनिवार---गुलाबी



या रांगोळी ने तब्येत चांगली राहते. आणि भत ,पिशाच बाधा होत नाही.

७) रविवार— हिरवा



या रांगोळी ने हाती घेतलेले काम पूर्ण होऊन सिद्धी प्राप्त होते. आणि सूर्य पूजनाचा लाभ होतो.

# "एकांकिका" कार्यक्रमा दरम्यान बालमित्रांनी चित्राविलेली काही रंगचित्रे

आपल्या बालमित्रांनी मंडळाच्या "एकांकिकेच्या" कार्यक्रमा दरम्यान चित्राविलेली काही रंगचित्रे आम्ही या अंकात समाविष्ट करीत आहोत. प्रेक्षकांना एकांकिकेचा मनमुराद आनंद लुटता यावा यासाठी आपल्या महाराष्ट्र मंडळ समितीच्या कार्यकर्त्यांनी प्रेक्षागृहाच्या बाहेर मंडळाच्या छोट्या सदस्यांसाठी चित्रकलेचे आयोजन केले होते.









**नमस्कार मंडळी,**
**'महाराष्ट्र मंडळ अबुधाबीचा' हा परिवार म्हणजे मराठी संस्कृतीशी नात दृढ करण्याचे केंद्र.**
**'महाराष्ट्र मंडळ अबुधाबीच्या' परिवाराचा विस्तार होण्यामागे नवीन सदस्यांनी केलेल्या नोंदणीचा वाटा नेहमीच महत्त्वाचा राहिला आहे.**
**आपल्या या परिवारात नव्याने आगमन केलेल्या आपल्या परिवार मित्रांचे स्वागत करूया.**

| नाव | दूरध्वनी क्र. | कार्यालय | अबुधाबी वास्तव्य | भारत वास्तव्य |
|---|---|---|---|---|
| श्री. मल्लिकार्जुन चिल्लाल<br>सौ. श्रीदेवी चिल्लाल | ०५६-२७९७३९८<br>०५६-२१६८६२२ | Johnson Controls | मुसफ्फा | मुंबई |
| श्री. पंकज भामरे | ०५६-१५२०२१९ | Neopharma | मुसफ्फा | धुळे |
| श्री. तुषार राउत<br>सौ. स्वागता राउत | ०५०-१५९८२१७<br>०५५-१६८४५५० | Al Habtoor Group | मुरूर रोड | यवतमाळ |
| श्री. अनिल महाजन | ०५६-९१६५७६५ | ADCO | इलेक्ट्रा स्ट्रीट | नागपूर |

**धन्यवाद,**
**महाराष्ट्र मंडळ अबुधाबी कार्यकारी समिती २०१४-१५**